**वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभालीच्या कामकाजासाठी सन २०२३-२४ या वर्षासाठी मेसर्स महा-आयटी यांना मुदतवाढ देण्याबाबत व संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभाल खर्चास प्रशासकीय मंजूरी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०२३/प्र.क्र.७/ग्रा.सं.३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ मार्च, २०२४

<u>वाचा</u> - १) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. वैमाशा-२०२०/प्र.क्र.२६/ ग्रासं.३, दि.१७.०३.२०२०
२) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. वैमाशा-२०२२ / ५१/प्र.क्र.१५ ग्रासं-३, दि. २९ मार्च, २०२२
३) नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांचे पत्र क्र. वैमाशा-१४/ संगणकीकरण/२०२३/९७२, दि. ५ सप्टेंबर, २०२३

**<u>प्रस्तावना :-</u>**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अखत्यारित वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरणाचे काम मेसर्स महा-आयटी यांचेमार्फत सन २०१८ मध्ये पूर्ण करण्यात आले असून तेव्हा पासून सदर प्रकल्पाच्या देखभालीचे काम महा-आयटी यांचेमार्फत करण्यात येत आहे. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये सदर प्रयोजनार्थ प्रतीवर्षी येणा-या आवर्ती खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. यापूर्वी प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २८ जानेवारी, २०२१ रोजी झालेल्या बैठकीमध्ये संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभालीचे काम दिनांक ३१ मार्च, २०२२ पर्यंत महा-आयटी कडे देण्यास मान्यता देण्यात आली होती. सदर मुदत संपुष्टात आल्यामुळे नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांनी दिनांक ५ सप्टेंबर, २०२३ च्या पत्रान्वये महा-आयटी यांना दिनांक १ एप्रिल, २०२२ पासून पुढे मुदतवाढ देणे तसेच प्रस्तावित खर्चास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास दिनांक २/११/२०२३ रोजी झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये मान्यता घेण्यात आली. त्यानूसार सदर प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभालीच्या कामकाजासाठी सन २०२३-२४ या वर्षासाठी मेसर्स महा-आयटी यांना मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांनी याबाबत महा-आयटी यांच्यासोबत सामंजस्य करार (MOU) करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

२. वैधमापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभालीसाठी महा-आयटी ने नियुक्त केलेल्या मनुष्यबळासाठी सन २०२३-२४ साठी रु. २,१५,३६,६५५ /- इतक्या अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर खर्च मागणी क्र.एम-३, मुख्य लेखाशिर्ष ३४७५- इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा, १०६- वजने व मापे यांचे विनियमन, (००) (०१) वजने व मापे विनियमन- (नियंत्रक, उप नियंत्रक, वजने व मापे यांची कार्यालये) (३४७५००९३), १७- संगणक खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिनांक २/११/२०२३ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/, विनियम-भाग-२, दिनांक १७ एप्रिल २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग- तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास दिलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०४१६१७४८१२५९०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJASHREE RAHUL SARANG

Digitally signed by RAJASHREE RAHUL SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=5c072530c0f2940404764b5dc00127bb99ecf9466431dc1a1a4e123b229e41c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B9A36FAE4EC39263A2A8DF78B48FC28B92B165E239815B0CDCEF1A4B5928579, cn=RAJASHREE RAHUL SARANG
Date: 2024.04.16 18:00:15 +05'30'

**( राजश्री रा. सारंग )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२.महालेखापाल-१, (लेखा व परीक्षा), मुंबई.
३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई.
६.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
७.वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (ग्रा.सं.३)